**आहरण व संवितरण अधिकाऱ्यांच्या माहितीतील बदल करण्यासाठी संगणकीकृत प्रस्ताव सादर करण्याची कार्यपध्दती.**

**महाराष्ट्र शासन**
**वित्त विभाग,**
**मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.**

शासन परिपत्रक क्र. संकीर्ण - १०१० / प्र. क्र. १० / कोषा प्र - ५
दिनांक : ०९ फेब्रुवारी, २०१०

संदर्भ : शासन परिपत्रक क्र. संकीर्ण - १००९ / प्र. क्र. २६ / कोषा प्र - ५, दिनांक २४/०६/२००९.

परिपत्रक : नवीन आहरण व संवितरण अधिकारी संकेतांक प्रदान करण्यासाठी अवलंब करावयाच्या संगणकीकृत कार्यपध्दतीबाबत संदर्भ क्रमांक १ मधील परिपत्रकान्वये सूचना यापूर्वीच निर्गमित करण्यात आलेल्या आहेत.

आहरण व संवितरण आधिकाऱ्याच्या कार्यालयाचे नाव / पत्ता, पदनाम, कोषागाराच्या ठिकाणात बदल अथवा अधिकाराचे प्रत्यायोजन केल्यामुळे आहरण व संवितरण अधिकाऱ्यात बदल झाल्यास त्यासंबंधीची नोंद वित्त विभागाच्या विविध संगणक प्रणालीत तसेच कोषागाराच्या संगणकीकृत संदर्भ नस्तीत करण्यासाठी संगणकीकृत कार्यपध्दती अस्तित्वात आणण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती. याकरीता राष्ट्रीय सूचना विज्ञान केंद्र, पुणे यांच्या सहाय्याने आज्ञावली विकसीत करण्यात आली आहे. आहरण व संवितरण अधिकाऱ्यांच्या संदर्भातील माहितीत बदल झाल्यास तो बदल शिघ्रतेने व अचुकतेने नोंदला जावा या उद्देशाने ही आज्ञावली विकसीत करण्यात आलेली आहे. या आज्ञावलीद्वारे सध्या अस्तित्वात असलेला आहरण व संवितरण अधिकाऱ्याच्या पदनाम / कार्यालय / कोषागाराचे ठिकाण इत्यादी स्वरूपाचा बदल झाल्यास त्याबाबतची माहिती संगणक प्रणालीतून नोंदवून त्याद्वारे माहितीतील बदलांचा संगणकीकृत प्रस्ताव निर्मित करावयाची कार्यपध्दती पुढीलप्रमाणे राहील.

१) आहरण व संवितरण अधिकाऱ्याच्या माहितीतील बदलाचा संगणकीकृत प्रस्ताव सादर करण्याची सुविधा अर्थसंकल्प अंदाज वितरण व संनियंत्रण प्रणाली (BEAMS) बीम्स वरील आहरण व संवितरण अधिकाऱ्याच्या फायनल मोडला उपलब्ध असेल.

२) ज्या आहरण व संवितरण अधिकाऱ्याला त्याच्या पदनामाच्या माहितीत बदल करावयाचा असेल त्यांनी "बीम्स" प्रणालीवर आहरण व संवितरण अधिकारी संकेतांक युजर आय डी टाकून फायनल मोड मध्ये प्रवेश करावा (Login)

३) त्यानंतर मेन्टेनन्स मेनू मध्ये "Change DDO Details Proposal" हा विकल्प दिसेल. त्यावर क्लीक केल्यानंतर माहितीत बदल करावयाचा नमुना उपलब्ध होईल.

४) या नमुन्यामध्ये सर्वात प्रथम पदनाम बदल, त्यानंतर कार्यालयात बदल व शेवटी आहरण व संवितरण अधिकाऱ्याच्या सध्याच्या कोषागारात बदल करण्याबाबत सुविधा देण्यात आली आहे.

५) या तीन कारणांपैकी योग्य त्या एक किंवा एकापेक्षा जास्त कारणाच्या रकान्यात दिलेल्या चौकोनात क्लीक करावे म्हणजे त्या ठिकाणी बरोबरची खुण उमटेल व आवश्यक बदल नोंदविण्यासाठी रकाने उपलब्ध होतील. रकान्यात आवश्यक त्या नवीन बदलाची माहिती नोंदवावी / भरावी.

६) आहरण व संवितरण अधिकाऱ्याच्या सध्याच्या पदनामात बदल करावयाचा असल्यास तो बदल कोणत्या कारणास्तव करावयाचा आहे म्हणजेच अधिकाराचे प्रत्यायोजन, श्रेणीवाढ / श्रेणीघट किंवा इतर कारण यापैकी योग्य चौकोनात क्लीक करावे.

७) त्यानंतर तो बदल ज्या शासन निर्णय / कार्यालयीन आदेश / परिपत्रकान्वये झाला असेल त्याची माहिती त्यासाठी दिलेल्या रकान्यात भरावी. त्याचा क्रमांक व दिनांक भरावा. यामध्ये २ पैकी किमान १ नोंद करणे अनिवार्य असेल.

८) शेवटी सुरक्षीततेच्या दृष्टीकोनातून दर्शविलेला इंग्रजी शब्द त्या खालील रिकाम्या जागेत भरुन सबमीट या बटणावर क्लीक करावे. त्यानंतर "आपल्याला प्रस्ताव तयार करावयाचा आहे काय?" अशी विचारणा करणारा संदेश दिसेल. त्याखाली OK बटणावर क्लीक केल्यानंतर संगणकीकृत प्रस्ताव स्क्रिनवर दिसेल. सदर पत्रासोबत सहपत्रासह प्रस्ताव संचालक, लेखा व कोषागारे, संगणक शाखा, पाचवा मजला, नवीन प्रशासकीय भवन, मुंबई येथे सादर करावा.

सदर प्रस्ताव संचालनालयास प्राप्त झाल्यानंतर संबंधीत प्रस्ताव तपासून प्रणालीवरच मान्यता दिली जाईल व त्यानंतर सुधारणा केल्याबाबतचे पत्र प्रणालीद्वारे निर्मित होईल. सदर पत्राची संगणकीकृत प्रत संबंधीत आहरण व संवितरण अधिकाऱ्याला पाठविली जाईल.

प्रशासनिक विभागांनी त्यांच्या अधिनस्त असलेल्या कार्यालयातील सर्व आहरण व संवितरण अधिकाऱ्यांच्या निदर्शनास हे परिपत्रक आणून द्यावे व त्यांना आहरण व संवितरण अधिकाऱ्यांच्या माहितीत बदल करावयाचा असल्यास परिपत्रकात नमूद केलेली कार्यवाही करण्याबाबत सूचना द्याव्यात.

हे परिपत्रक शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आले असून त्याचा संगणक संकेतांक २०१००२१०१२५७३६००१ असा आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

(स.अ.मु. नकवी)
उप सचिव

प्रति,
राज्यपालांचे सचिव,
मुख्यमंत्र्यांचे व उप मुख्यमंत्र्यांचे सचिव,
सर्व मंत्री व राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव,
सर्व मंत्रालयीन प्रशासकीय विभाग,
सर्व विभागीय आयुक्त,
सर्व जिल्हाधिकारी,
सर्व जिल्हा परिषदांचे मुख्य कार्यकारी अधिकारी,
सर्व जिल्हा परिषदांचे मुख्य वित्त व लेखा अधिकारी,
मंत्रालयाच्या सर्व विभागांच्या अधिपत्याखालील विभाग प्रमुख व कार्यालय मुख,
प्रशासकीय विभागांच्या नियंत्रणाखालील सर्व कार्यालय प्रमुख,
महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता)-१, महाराष्ट्र, मुंबई,
महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता)-२, महाराष्ट्र, नागपूर,
प्रधान महालेखापाल (लेखा परीक्षा)-१, महाराष्ट्र, मुंबई,
महालेखापाल (लेखा परीक्षा)-२ - महाराष्ट्र, नागपूर,
महालेखापाल (वाणिज्यिक लेखापरीक्षा), महाराष्ट्र, मुंबई,
सचिव, महाराष्ट्र विधान मंडळ सचिवालय, मुंबई,
प्रबंधक, उच्च न्यायालय (मूळ शाखा), मुंबई,
प्रबंधक, उच्च न्यायालय (अपील शाखा), मुंबई,
प्रबंधक, महाराष्ट्र प्रशासकीय न्यायाधिकरण, मुंबई
सचिव, महाराष्ट्र लोकसेवा आयोग, मुंबई,
प्रबंधक, लोक आयुक्त व उप लोक आयुक्त यांचे कार्यालय, मुंबई,
संचालक, लेखा व कोषागारे, मुंबई,
मुख्य लेखा परीक्षक, स्थानिक निधी लेखा, कोकण भवन, नवी मुंबई,
उप मुख्य लेखा परीक्षक (वरिष्ठ) स्थानिक निधी लेखा, मुंबई/पुणे/नागपूर/औरंगाबाद/नाशिक/अमरावती,
सर्व जिल्हा लेखा परीक्षा अधिकारी, स्थानिक निधी लेखा,
उपसंचालक, ले. व को. पुणे, नाशिक, नागपूर, अमरावती, औरंगाबाद, कोकण भवन, नवी मुंबई.
अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई / वांद्रे,
निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई,
सर्व कोषागार अधिकारी,
सर्व उपकोषागार अधिकारी,
वित्त विभागातील सर्व कार्यासने,
जनसंपर्क अधिकारी, मंत्रालय, मुंबई.
निवड नस्ती, कोषा प्रशा-५ कार्यासन, वित्त विभाग

********